

# " हिझ मास्टर्स व्हॉईस " रेकॉर्ड.



मास्टर दीनानाथ.

## नवीन इलेक्ट्रीक रेकॉर्डींग

SECOND MARATHI SUPPLEMENT 1930

# अगत्याची सूचना.



सन १९११ च्या कॉपीराईट कायद्यामध्यें फोनोग्राफ रेकॉर्डचा समावेश केला आहे. त्याचा जो कोणी कायदेभंग करील त्याचेवर कायदेशीर इलाज केला जाईल.



या कॅटलॉगमधील भाव डिस्कौंटशिवाय आहेत. जो कोणी कमी किंमतीस विकील त्याचेवर कायदेशीर इलाज करण्यांत येईल; व त्यास कमी किंमतीस विकण्याचा अधिकार नाहीं.

---

# हिझ मास्टर्स व्हाईस

## HIS MASTER'S VOICE.

28, RAMPART ROW, FORT, BOMBAY.

33, Jessore Road, Dum Dum Cant. Bengal.

# "HIS MASTER'S VOICE"

New 10″ Double Sided Records.

Marathi and Hindustani Songs.

Price Rs. 3-8 each.

SEPTEMBER 1930.




# " हिझ मास्टर्स व्हॉईस "

नवीन १० इंची दोन्ही बाजूचे रेकार्ड.

मराठी आणि हिंदुस्थानी पदें.

किंमत रु. ३-८ प्रत्येकीं.

सप्टेंबर १९३०.

# MARATHI RECORDS. मराठी रेकार्ड.

## Mr. PENDHARKAR. मि. पेंढारकर.

| | | |
|---|---|---|
| P 13369 | अष्टमीचा चंद्र शोभे | मूकनायक |
| १३३६९ | सहज कशी खेळविते ललना | ,, |

श्रीयुत **पेंढारकर** यांची रसिकांस ओळख करून देणें आणि भ्रमरास पुष्पाची ओळख करून देणें अगदीं सारखें आहे. कारण यांचा कोणताही रेकार्ड घ्या तो दण-दणीत असतो इतकेंच नाहीं तर बैठकीला रंग चढवितो. यांचे खालील दोन पदांचे रेकार्डस तयार झाले आहेत.

एक बाजूः—अष्टमीचा चंद्र शोभे व्योमभागीं विहरतां ॥
सकल जगतावरति रजतासदृश किरणां वर्षतां ॥ धृ० ॥
अल्पतेजा सकल भूतांठायिं पसरी मृदुलता ॥
पौर्णिमेच्या इंदुहूनि अंगीं धरितो चारुता ॥ १ ॥
निर्मि कवितासारभूता आसमंतात् खिन्नता ॥
कविजनांच्या कल्पनेला चेतवीतो सर्वथा ॥ २ ॥

दुसरी बाजूः—सहज कशी खेळविते ललना ॥ धृ० ॥
रमणीलोचन तेंवि फिरें मी,
मी तेंवीं मम सेना ॥ १ ॥
या विश्वाचें स्त्रीलोचनयुग
चालक मेरु असेना ॥ २ ॥

| | | | |
|---|---|---|---|
| P 13295 | ललना पाणि ग्रहना याजना | शिक्काकट्यार | ( कर्नाटकी ) |
| १३२९५ | धुमत ध्वनि का हा | ,, | ( बागेश्री ) |
| P 13355 | पशुमात्र खचित गणला | श्री | ( अडाणा ) |
| १३३५५ | आशा हांसे नाचे | ,, | ( काफी ) |

## Master DINANATH. मास्टर दिनानाथ.

P 13370 { शंकर भंडारी भोले (एका शंकरा )
१३३७० { चराचरीं या तुझा असे निवासभावबन्धन ( बेहाग )

मास्टर **दिनानाथ** यानीं आपल्या मधुर व चटकदार गायनानें व विशेषतः " परवशता पाश दैवें " ह्या पदानें लोकांवर किती छाप बसविली आहे याची कल्पना त्यांच्या रेकार्डसच्या येणाऱ्या मागण्यांवरून आम्हांस झाली आहे. यांच्या रेकॉर्डस-मध्यें खालील रेकार्डसची भर घालण्यांत आली आहे.

एक बाजूः—शंकर भंडारी भोले मस्तकपर चंद्र सोवे
अंगनमे भस्मराचे नन्दीगण संग डोले ॥ धृ० ॥
मुंडनकी माल साजे शीस गंगनाद बाजे ॥
तीन नेत्र पांच वक्त्र काशिराम जय बाले ॥

दुसरी बाजूः—सकल चराचरीं या तुझा असे निवास ॥ धृ० ॥
पाषाणाच्या वससि जरी मूर्तिमधीं ।
उपलहृदयिं वससि खास ॥ १ ॥

P 13356 { परवशता पाश दैवें रणदुंदुभि ( कवाली )
१३३५६ { शांत दांत कलिकाही रामराज्यवियोग ( बिहाग )

P 13357 { नन्नु ब्रोवणी ( अध्धा तेलगू )
१३३५७ { दिव्य स्वातंत्र्य रणदुंदुभि ( मालकौंस )

## Mr. KRISHNARAO SHENDE. श्रीयुत कृष्णराव शेंडे.

P 13371 { धांवे या देव लोका शिवसम्राट ( भूप )
१३३७१ { सखी कां हा देश हा कुणाचा ? ,, ( कवाली )

श्रीयुत **कृष्णरावांच्या** उठावदार गायन पद्धतीनें बैठकीस कसा रंग चढतो हे सांगण्याची जरूरी नाहीं. नैसर्गिक गोड आवाजाला सशास्त्र गायनाची साथ असल्या-मुळें ह्यांचें गाणें रसिकांस तेव्हांच वेड लावतें. संगीत शिवसम्राट नाटकांतून घेतलेली

खालील दोन पदें त्यांच्या आंगच्या कलेचे उत्कृष्ट नमुने आहेत. हे रेकॉर्डस रसिकांनीं वाजवून पाहवे म्हणजे आमच्या म्हणण्याची सत्यता पटेल.

एक बाजूः––धांवे या देव लोका ॥ धृ० ॥
शीवकर जगीं मीरवित जयां, मीरवित जया
दया नत्या नया ल्या नने सुखें हा ॥
हताबलता महा बला खला ॥ धांवे या देव लोका ॥

दुसरी बाजूः––सखी कां हा देश कुणाचा ? जो येई यांत त्याचा ॥
चिर दारुणापदांचा । विकल्या मुक्या जीवांचा ॥
तें रामराज्य गेलें । किती तक्कराज मेले ॥
ही आर्यभू विटाळे । भूमाय वारयोषा ॥
हा हिंदवासीयांचा । ज्या जनीं तयांत त्याचा ॥
इत बार ना कुणाचा । दे देवतासी थारा ॥

| | | |
|---|---|---|
| P 13299 १३२९९ | सद्गुरूवांचोनी सांपडेना सोय | अभंग ( बिहाग ) |
| | नाम गाऊं नाम ध्यावूं नाम विठोबाला वाहुं | ,, ( पहाडी ) |
| P 13300 १३३०० | माया मोहीनी कुलटा नाचे महिंया कलंकी समशेर | ( पहाडी ) |
| | विमल करीं माझा कर गुंतला | ,, ,, ( भैरवी ) |
| P 13359 १३३५९ | सुशिला शशिप्रभा | लढाईकी लग्न ( जिल्हा ) |
| | सुहासिनी सुभाषिणी सुधा जनीं | ,, ,, ( तिलंग ) |

## MASTER SHANTARAM. मास्टर शान्ताराम.

| | | |
|---|---|---|
| P 13372 १३३७२ | कटु जीवना कंटाळलें | वरवंचना |
| | हा धनु स्वजन–वध–कारि ना ? । | धनुर्भंग |

असा कोण मनुष्य आहे कीं ज्याला आपल्या अस्खलित वाणीनें, गोड आवाजानें आणि सावकाश गायन पद्धतीनें मास्टर **शांताराम** यानीं मंत्र मुग्ध केलें नाहीं ? खालील दोन पदें नवीन घेतलीं आहेत तीं लोकाश्रयास पात्र होतीलच.

एक बाजू:—कटुजीवना कंटाळले ॥ नच दैव टळतें जरि टाळलें ॥ धृ० ॥
म्यां पूर्वजन्मीं, सुख संपवीलें ॥ असुखें म्हणोनी कवटाळिलें ॥ १ ॥
नसे बंधुमाता, ममता न ताता ॥ पिता म्हणती होता ।
कधीं ? कोण ? नकळे ॥ तनु वाहिली ज्यां, नच ठाव त्यांचा ॥
वाटे विफल कीं मन जाळिलें ॥ २ ॥

दूसरी बाजू:—हा धनु स्वजन–वध–कारिना ?
सखये; अर्पिन मी विबुध मख पालका ।
पावन करिल जो याला ॥ धृ० ॥
शाम राम जो वधिल रावणा । जो ने धर्म लयाला ।
लावूनि शर मग या चापाला । रक्षिल हाच जनाला ॥ १ ॥

| | | | |
|---|---|---|---|
| P 13301 / १३३०१ | सुखनिदान मम प्राण धाम | वऱ्हाडचा पाटील | ( जीवनपुरी ) |
| | दे माझिया या धनाला | ,, ,, | ( भैरवी ) |
| P 13302 / १३३०२ | संशय हा अति विषारी | ,, ,, | ( खमाज ) |
| | लोभ ना मनाला खोठ्या धनाला | ,, ,, | ( बागेश्री ) |
| P 13360 / १३३६० | बालांसि जगतांत | हास्यतरंग ,, | ( भीमपलास ) |
| | आला अनुभव सकल मज | ,, ,, | ( बिहाग ) |

## Mr. SHANKARRAO KHATU. मि० शंकरराव खातू.

| | | |
|---|---|---|
| P 13373 / १३३७३ | येरे येरे माझ्या रामा | भजन |
| | माझ्या बोबडीया बोला | ,, |

सुरेल आवाजानें भक्तिप्रधान भजन गावून श्रोत्यांची हृदयें हालवून सोडणारे श्रीयुत **शंकरराव खातू** लोकांच्या चिरपरिचियाचे आहेत. हे लोकांची करमणूक करितातच आणखी यांच्या रसाळ भजनानें समाजावर नैतिक परिणाम उत्तम होतो. यावेळीं त्याचीं खालील दोन पदें घेतलीं आहेत.

एक बाजूः—येरे येरे माझ्या रामा । मनमोहन मघःश्यामा ॥ धृ० ॥
संत मिसें भेटीं । देईं देईं कृपा गोष्ठी ॥
आमुची चुकवी जन्मव्याधी ! आम्हां देईं हो समाधी ॥
जनी म्हणे चक्रपाणी । करी ऐशी हो करणी ॥ १ ॥

दुसरी बाजूः—माझ्या बोबडीया बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला ॥
वारा जाय भलत्या ठायां । तैशी माझी राय छाया ॥
गातां येईल तेणेंची गावें । येरिं हरि हरि म्हणावें ॥
तान मान नेणें देवा । नामा विनवितो केशवा ॥ १ ॥

| | | |
|---|---|---|
| P 13364 १३३६४ | बोलूं ऐसे बोल | अभंग |
| | गोविंद गोविंद मना लागलीया छंद | ,, |

**Mr. FULAJI BOA.** **श्री. फुलाजी बुवा.**

| | | |
|---|---|---|
| P 13374 १३३७४ | कृष्ण माझा कणकण करितो | अभंग |
| | नन्दनन्दन मुरलीवाला | अभंग |

पाखंडी नास्तिकालाही आस्तिक करण्याची विलक्षण जादू बुवांच्या गाण्यांत नाहीं असें कोण म्हणेल ? हृदयाचा ठाव घेणारे निवडक अभंग ठसवून म्हणण्याच्या यांच्या हातोटीनें श्रोतृवृंद केव्हांच तल्लीन होईल यांत नवल नाहीं. यांच्या रेकॉर्डस साठीं भाविकांच्या उड्या पडतात म्हणून यावेळीं त्यांच्या खालील आवडत्या अभंगाचे रेकॉर्डस घेतले आहेत.

एक बाजूः—कृष्ण माझा कणकण करितो । दृष्ट झाली कीं काय गे ॥ धृ० ॥
रामरक्षा असें मिळोनी । कुणितरी करा उपाय गे ॥
मीठ मोहऱ्या मिरच्या उतरुनि । देईन ब्राह्मणा गाय गे ॥
लावा अंगारा मार्ग मळीन मीं । पूजीन सटवा माय गे ॥
मेंढा कोंबडा बळी म्यां देतें । कृपा करील मनुराज गे ॥
हंसत चालिला राधिकेसंगें । वंदू यदुपति पाय गे ॥ १ ॥

दुसरी बाजू:—नन्दनन्दन मुरलीवाला । याच्या मुरलीचा वेध लागला ॥
प्रपंच धंदा नाठवे कांहीं । मुरलीचा नाद भरला हृदयीं ॥
पति सुखाचा विसर पडला । याच्या मुरलीचा छंद लागला ॥
एका जनार्दनीं मुरलीचा नाद । ऐकतां होती त्या सद्गद ॥ १ ॥

| | | |
|---|---|---|
| P 13303 | जगीं विठ्ठल रुक्मीणी | अभंग |
| १३३०३ | रुक्मीणीच्या कुंका | अभंग |
| P 13363 | कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता | अभंग |
| १३३६३ | दोंदील दोंदील ठमकत चाले | अभंग |

**PAISA FUND MELA** **पैसा फंड मेळा.**

| | | |
|---|---|---|
| | **Miss VARU JOSHI** | मिस् वारू जोशी |
| P 13375 | सुखाचा सूर्य मावळतां | कवाली |
| | **Miss SHANTA PATHAK** | मिस् शांता पाठक. |
| १३३७५ | देशाला देव माना | भैरवी |

या बाल गायिकांनीं हजारों लोकांचीं मनें आपल्याकडे खेंचून घेतलीं आहेत. याच्या रेखीव गायनाचें कौतुक करावेंसें कोणाला वाटणार नाहीं. वारंवार येणाऱ्या सुचनांवरून यांचे खालिल रेकॉडस घेतले आहेत.

एक बाजूः--सुखाचा सूर्य मावळतां । निशेनें व्यापिलें आतां ॥ ध्रु० ॥
कशाचे वेदघोष आतां । आटली तत्वगुणसरिता ।
मिळेना शांतता चित्ता । कशाची इशपदिं स्थिरता ॥ १ ॥
करींची केवढी सत्ता । कुठें ती बुद्धिचीमत्ता ।
ललाटीं दास्य हें येतां । होशी तुच्छ तूं भरता ॥ २ ॥

दुसरी बाजू:—देशाला देवमानाही विनंती जनां
ऐक्यसुमांच्या माला गुंफा
भावबलें वाही चरणा ॥ १ ॥
कीर्ती गाजो डंका वाजो
नाशो ही देश दैना ॥ २ ॥

P 13376 / १३३७६
- **Miss SUMAN PARCHURE** मिस् सुमन परचुरे.
  ब्रिजलाल वांसरीवाला. — गजल.
- **Miss VARU JOSHI** मिस् वारू जोशी.
  देवा करी दया आतां — सारंग.

एक बाजूः—ब्रिजलाल बांसरीवाला ।
गुंतला कुठें या काला ॥
जगिं कोण बाली गोपाला ।
या दीन गोधनाला ॥
रुसलास कां कन्हैया ।
आळवोनि कंठ शिणला ॥

दुसरी बाजूः—देवा करीं दया । आतां । हरी भया ॥ धृ० ॥
दीन जनांची कोणा माया ।
यावी कैशी प्रभु तुजवांचुनियां ॥ करीं दया ॥
देशकारणीं देई झटाया ।
तेज धैर्य सकलां प्रभुराया ॥ करीं दया ॥

गेल्या साहा महिन्यांत निघालेले रेकॉर्डस्

## Prof. NARAYANRAO VYAS प्रो० नारायणराव व्यास.

| | | |
|---|---|---|
| P 13296 | जानकी नाथा कृपा करी | खमाव मांड |
| १३२९६ | अविनाशी हा आत्मा | दुर्गा |

## BAI SUNDERA BAI बाई सुंदराबाई.

| | | |
|---|---|---|
| P 13297 | तुम्ही माझे सावकार भाग १ ला | लावणी |
| १३२९७ | ,, ,, ,, भाग २ रा | ,, |
| P 13298 | तरूण ज्वानीचे डौल साजणी | ,, |
| १३२९८ | चंद्र चकोरा परी | ,, |

| | | |
|---|---|---|
| P 13358 | तुझें थरकत थरकत चालणं | ,, |
| १३३५८ | नको नादीं लाऊं | ,, |

**Mr. VISHNUPANT PAGNIS श्रीयुत विष्णुपंत पागनिस.**

| | | |
|---|---|---|
| P 13361 | वन्दे मातरम् | राष्ट्रगीत सारंग. |
| १३३६१ | पतितम् दिनोद्धरणम् | कर्नाटकी. |

**Mr. KESHAVRAO BHOLE. मि. केशवराव भोळे.**

| | | |
|---|---|---|
| P 13362 | सुंदरा गमेना ती बाला | वरवंचना ( काफी ) |
| १३३६२ | किती गोड गोड वदला | गीत |



# HINDUSTANI RECORDS. हिंदुस्तानी रेकॉर्ड.

## Prof. NARAYANRAO VYAS. प्रो० नारायणराव व्यास.

P 13377 १३३७७ { फुलवाले कंत मैका बसंत — राग-बहार
बालम मोरा सुनी हो — राग-मिश्र मांड.

हा स्वयंप्रकाशी तारा पूर्ण प्रकाशीत होतो न होतो तोंच अलम गायन प्रेमी लोकांची हृदयें काबिज करून, आपल्या आंगच्या अद्वितीय गायन कौशल्यानें श्री० शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी पी. एच. डी. यांचेकडून " संगीत प्रवीण " ही मानाची पदवी पटकावून बसला. यांचे रेकॉर्ड वाजत असतां मनुष्य भान विसरून जातो अशी यांच्या गायनांत मोहिनी भरली आहे.

एक बाजूः--फुलवाले कंत मैका बसंत गरवा मोल ले देरे ॥
अतर पियासो वो जहां कहीयो तन ऐसो बिरवा मोलरे देरे ॥ १ ॥

दुसरी बाजूः--बालम मोरा सुनी हो ॥ महेल पधारो धीमा
मोसे बोलो, वारीरे झरुके झूंका रंग दे ॥ १ ॥

P 13366 १३३६६ { नीर भरन मै तो चली जात हूं — मालकौंस
कदर प्यारे लागे तुमसे नैन — मिश्र पिलु ठुंबरी.

## BAI LAXMI BAI. बाई लक्ष्मीबाई.

P 13378 १३३७८ { थेम्हांसे कांई रार — भूप.
बन्सीयाकी धुंन सुन — देस.

आपल्या कर्णमधुर आलापांनीं श्रोत्यांला मुग्ध करण्याची कला यानांच चांगली साधली आहे. श्री० शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी पी. एच. डी. यांनीं यांना " गान चंद्रिका " ही दिलेली पदवी अगदीं यथार्थ आहे. यांचा आतां नविन एक रेकार्ड तयार झाला आहे.

एक बाजूः--थेम्हांसे कांई रार करो छे गा
मारु हुंतो थारी दासी ॥ १ ॥

दुसरी बाजूः--बन्सीयाकी धुनसुनसुन मन छीन छीन घबरावे ॥ १ ॥
हुक उठत बार बार आवत नाहीं जीयाको करार
निकसी नार तजके द्वार सुधबुध बिसराई ॥ १ ॥

| | | |
|---|---|---|
| P 13365 १३३६५ | बाजे झनन पायल मोरी | अडाणा कानडा. |
| | छोडो छोडोजी बेहरी | खमाज ठुमरी |

## BAI SUNDERABAI. बाई सुंदराबाई.

| | | |
|---|---|---|
| P 13379 १३३७९ | अगर्चे बंदन वाजिकी | गझल |
| | दिलबे करार तूंने | ,, |

जनानी आवाज–शृंगारिक पदें आणि गायन कलेंत प्राविण्य असा त्रिवेणी संगम यांच्याच गायनांत झाला असल्यामुळें याच्या रेकॉर्डसवर लोकांच्या नेहमींच उड्या पडत असतात. यांचे नविन रेकॉर्डस लोकांस मिळावे म्हणून यावेळीं महत्प्रयासानें याचा खालील रेकॉर्ड घेतला आहे.

एक बाजूः—अगर्चे बंद नवाजिकी तुजमें रवूं हो ज्या आऽआ
क़सम खुदाक खुदा तुही तू हो ज्या आऽआ
तेरे गबर अगर मैं कशी करूं साकी
शराब ज्वानमय आतेही बसलह हो ज्वाऽआऽ
अगर्चे परदा दरीका खयाल है तुझको
के परदेहीमें किसी रोज गुफ्त तूं हो ज्या ऽआऽ
अगरचे कदमो मैं अपने जगेदे थोडी सीई
तेरी कसम तेरे मंजर ठकी आवरूं हो ज्याऽआऽ

दुसरी बाजूः—दिलबे करार तूंने मेरी ज्यानपर बनाली ॥ रे मेरी० ॥
मुझे हातमें मिलाया मेरी आबरू गमालीरे
मै कहुं तो कब सुनेंगे मुझे कुछ का कुछ कहें गेरे
ना बदल शके वो अपना वो म ज्वाजला ब्राली
सबए हिज्रकी अंधेरी वो पपैयेकी सदायेरे
मेरा दिल मसल रही है वो घंटाय काली कालीरे ॥

**Mr. VISHNUPANT PAGNIS.** **मि. विष्णुपंत पागनीस.**

P 13380 { होरी खेलनको जारी — हारीताल–दिपचंद
१३३८० { लगत सावन घर आजा — तिलक–कमोद

हे उत्तम प्रकारचे गवयी आहेत व संस्कृत गाणीं म्हणण्यांत यांचा हातखंडा आहे. यांची खालील दोन पदें हिंदुस्थानी उत्तम वठलीं आहेत.

एक बाजूः—होरी खेलनको जारी । बावरी । क्यारी करे तूं दिनके दिन ॥ धृ० ॥
जो जो सखीया । रंगीली रसीली ।
प्रीतकी केसर । मुंखसे मलेंगी ॥
होरि पियाके । अब नाह हूंगी ।
क्यारी करे तूं दिनके दिन ॥ १ ॥

दुसरी बाजूः—लगत सावन घर आजा । मिदेसी बालम तन अकेली ॥ धृ० ॥
वार गंगा वार जमुना बीच मढैया मोरी ॥
इतना संदेशा मोरा । मरजीसे कैं यो रे तन अकेली ॥ १ ॥

**Mr. MASTAK HUSSAIN.** **मि. मस्तक हुसेन,**

P 13381 { छननन बिछुवा बाजे — आसावरी-ख्याल
१३३८१ { येरी माईरी — यमन कल्याण-ख्याल

हे खानदानी गवयी आहेत व लोकांच्या अत्याग्रहामुळें यांची खालील दोन पदें घेतलीं आहेत. खां साहेबांची म्हणण्याची पद्धत श्रेष्ठ दर्जाची आहे. हा रेकॉर्ड वाजवून पाहा म्हणजे आपणांसही याची साक्ष पटेल.

एक बाजूः—छननन बिछुवा बाजे । छननन० ॥ धृ० ॥
तबतो हुं पियाके आपनकी आगये
भईल वा । चढाते शेज मोरी पायल बाजे ।
सास नंनदकी चोरी । छननन बिछुवा ॥

दुसरी बाजूः—येरी मोईरी । मै क्या कहुं तोसे वाहुके ढंग ॥ १ ॥

## Pr. KRISHNARAO TENDULKAR प्रो. कृष्णराव तेंडुलकर.

| | | |
|---|---|---|
| P 13382 | गुंदेला ओरी मालनियां | बागेश्री |
| १३३८२ | जावोजी जावो जावो मोरे | ,, |

प्रो. **कृष्णराव तेंडुलकर** हे एक प्रसिद्ध गायक आहेत. यांची जास्त ओळख करून देण्याची कांहीं जरुरी नाहीं. कारण गणपती उत्सवांत यांच्या ठिकठिकाणीं बैठका होतात. याच्या वरून त्यांची लोकप्रीयता दिसून येते. मुद्दाम लोकाग्रहास्तव आम्हीं महत्प्रयासानें यांचे खालील दोन पदांचे ( हिंदुस्थानी ) रेकॉर्डस तयार केले आहेत.

एक बाजूः--गुंदेला ओरी मालनियां बेगी हरवा करहुं सिंगरवाल
गुगरवाह सहस पियाको मनाऊं गाऊं मंगल
चार बधाऊं नित ऊठ करूं काज ॥ १ ॥
लगन मोरी लाग रही सजनी रजनी उनबीन
कैसे कटे अब घरि घरि पल पल छिन छिन
निसदीन यही काज ॥ २ ॥

दुसरी बाजूः--जावोजी जावो जावो मोरे फंद परोना ।
गुननिधान मोहन अरुश्याम सलोना ॥ १ ॥
सांवरो कन्हाई मानत नाहीं । काहे कुबेर
जोरीरे । धुम मचाना ॥ २ ॥

| | | | |
|---|---|---|---|
| P 13368 | सुमरन करे मना | भजन | ( मांड ) |
| १३३६८ | इतनी अरज मोरी मान | ,, | ( भैरवी ) |

## Mr. KESHAVRAO BHOLE. मि. केशवराव भोळे.

| | | |
|---|---|---|
| P 13383 | जाके मथुरा | भजन |
| १३३८३ | ढोला तो जगेना | ,, |

रेडिओ क्लबमध्यें वारंवार बैठकी झाल्यामुळें लोकांच्या परिचयाचे झालेले रा. केशवराव भोळे यांनीं खालील दोन गाण्यांत फारच कमाल केली आहे.

एक बाजू:—जाके मथुरा या कान्हानें घागरिया फोरी ।
ऐशी रीत तुज कौन शिखाई । किसने करत बरजोरी ॥ १ ॥
मिरा कहे प्रभु गिरीधर नागर । चरण कमल बलिहारी ॥ रामा ॥ २ ॥

दुसरी बाजू:—ढोला तो जगेना । मै जगाय हारीरे ॥ ढोला० ॥
उंचि अटरिया चंदनकी किंवरिया ।
तापरसे जबिछेना ॥ ढोलातो० ॥

## Dr. MHAISALKAR M. B,B. S. डॉ. म्हैसाळकर

| | | |
|---|---|---|
| P 13384 १३३८४ | कैशी बन्सीया बजावो रामा | ( जिल्हा ) |
| | कां रे नाठविशी कृपाळु देवासी | भजन ( पहाडी-मिश्र ) |

यांनीं आपल्या गायन कौशल्यानें व उठावदार पद्धतीनें लोकांना मोहिनी घातली आहे असें म्हटलें असतां अतिशयोक्ती होणार नाहीं. यांच्या आंगचें कसब तज्ज्ञांना वाहवा म्हणावयाला लावतें व लोकांना तटस्थ करून सोडतें. यांचे खालील रेकॉर्डस् लोकांच्या पसंतीस उतरतील अशी खात्री आहे.

एक बाजू:—कैशी बन्सी या बजावो । रामा सुध बिसराई ॥ धृ० ॥
आवो मेहेरबान जलभर लाये । मै जल भरने आयी ।
जब सुन पाई प्रेमकी बन्सी, सबनारी ऊठ धाई ॥ १ ॥

दुसरी बाजू:—कां रे नाठविशी कृपाळु देवासी । पोशितो जगासी एकलाची ॥
फुटे तरुवर उष्णकाळ मासीं । जीवन तयासी कोण घाली ॥
कोणे केली बाळा दुग्धाची उत्पत्ति । वाढवी श्रीपति सर्वे दोन्ही ॥
तुका म्हणे तेथें आहे विश्वंभर । करा निरंतर ध्यान त्याचें ॥ १ ॥

| | | |
|---|---|---|
| P 13367 १३३६७ | जमुनाके तीर होरी रचो कान्हा | जीवनपूरी मिश्र |
| | मोरे घर आवो बालमुवा | जयत कल्याण. |

# INSTRUMENTAL RECORDS वाद्यांचे रेकॉर्ड.

## Mr. GOVINDRAO TEMBE. मि० गोविंदराव टेंबे.

P 17557 हार्मोनियम तर्ज " खरा तो प्रेमा ना धरी लोभ " मांड–केरवा.
१७५५७ ,, ,, तेजा नभीं ज्या साहवेन कर्नाटकी.

पेटी वादन कलेंत श्री. **गोविंदराव टेंबे** यांनीं अखिल हिंदुस्थानांत अग्रेसरत्वाचा मान मिळविला आहे. त्याच्या पूर्वीच्या रेकॉर्डास ह्या दोन पदांची अप्रतिम जोड मिळाली आहे. गायन वादन प्रेमी लोकांनीं त्यांचा अवश्य फायदा घ्यावा.

P 17549 नृपतित कन्या चित्रवंचना भैरवी
१७५४९ कान्हा करत मोसे पूर्या धनाश्री

## Mr. VITHALRAO KORGAOKAR. मि. विठ्ठलराव कोरगांवकर

P 17558 दे हाता शरणागता भाग १ ला कर्नाटकी
१७५५८ ,, ,, २ रा ,,

श्री. **विठ्ठलराव कोरगांवकर** हे पेटी वादन कलेंत निष्णात असून श्रोतृगण यांच्या पेटी वादनावर नेहमीं खुष असतो. याची दोन पदें यावेळीं घेतलेलीं आहेत.

P 17550 सत्य वदे वचनाला पिलु-मिश्र, एकच प्याला
१७५५० साची कहो मोसे बतिया ठुंबरी

## Mr. ANNASAHEB MAINKAR. मि. अण्णासाहेब माईणकर

P 17559 हार्मोनियम तर्ज " कैसे बताऊं सैयां " काफी
१७५५९ हार्मोनियम तर्ज भैरवी

रा. अण्णासाहेब माईणकर यांनीं पेटी वादन कलेंत मिळविलेलें कौशल्य पाहून मनुष्य थक्क होऊन जातो. यावेळी त्याची आम्ही मोठ्या प्रयासानें दोन पदें घेतलीं आहेत.

## RAZAK SURAT BAND

## रॅझाक सुरत बँन्ड

P 17560 १७५६० { " कांटो लाग्योरें " बँडतर्ज / बँडतर्ज " भव्य भारतनी वाडीं " — सिराजुद्दौला "

" रॅझाक " सुरत बँड थेट इंग्लिश धर्तीवर किंबहुना त्याहीपेक्षां मनोरंजक असून त्याच्या रेकार्डसचा खप हीच त्याच्या लोकप्रियतेची जाहिरात आहे. यावेळी लोकांच्या आग्रहावरून " सिराजुद्दौला " या नाटकांतील दोन लोकप्रिय पदें घेतलीं केलीं आहेत.

P 17551 १७५५१ { पमग पमगरेसा निसा गमप — मुलतानी त्रिताल / निधपम पगमप पमगरे — यमन जलदा त्रिताल

# कलकत्यातील प्रमुख गवयांचे रेकॉर्डस.

## MISS INDUBALA.

## मिस इन्दुबाला.

P 10332 १०३३२ { जियरा से काहे नहि बोल — ठुमरी कारफा / मेरो नैन लोग उनसे — खमट

**मिस इन्दुबाला** यांचा स्वर मधुर असून शृंगाररसपूर्ण गायनाबद्दल यांचा लौकिक सर्वश्रुत आहे. या यांच्या असोलिक गुणाबद्दल सर्व हिंदुस्तानाभर यांची तारीफ होत आहे. यावेळीं वरिल दोन पदांचे रेकॉडस मुद्दाम तयार केले आहेत.

एक बाजूः—जियरासे काहे नहिं बोल–बोल मोरे राजा
अब छतीयन पर उमगे जोवन्वा–चोल्याके बन्द
अब खोल अब खोल मोरे राजारे–जियरा–अब खोल
अब जान पिया सौलन रस बस मये
जोबन मये है अन्मोल,..अन्मोल मोरे राजारे......

दुसरी बाजूः—मेरो नैनं लोग उनसे जिया चाहेसे करे
समझाये समझत नाहीं कोई लखजल करे
अब कैसी करूं सजनी मन धीर न धरे...मेरो......

P 10294 { जब नूरे खुदा हमको दो बार नजर आया — भैरवी
१०२९४ { तेरा नूर सबमें है जल्वागर — गजल

**PEARU QUAWAL.** **प्यारु कवाल**

P 10341 { माहे नेकि चुन्दरया रंगदे पिया — पीलू कहरवा.
१०३४१ { अपनी चांदसी सूरत दिखा दोनबी — पीलू

**प्यारु कव्वाल** हे उत्तर हिंदुस्थानांतील सर्वोत्कृष्ठ गवई आहेत. ह्या रेकॉर्डांत सुरेल आवाज़, सशास्त्र गायन पद्धत व त्याबरोबरील साथ याचा उत्तम मिलाफ आहे. आपण वाजवून पाहा म्हणजे आपल्याहि आमच्या म्हणण्याची साक्ष पटेल.

एक बाजूः—मोहे नेकि चुन्दरया रंग दे पिया
रंग दे रंगें हकीकत में मुझे रंगेरजतू
रंग मुझे रंग मै इतना तो करदे तेजतू
अपने गुलशनका बनादे मुझको नगमा रेजतू
जल्वाये रंगी दिखा दे अब अदा अंगेज तू...मोहेने कि...

है तमन्ना रात दिन देखूं तमाशा मै तेरां
हर निगाहे शौक में होतू ही तू जलवा नमा
तेरे रंगे खास में रंग जाये यह तन की कबा
और यह कहता फिरूं मै बेखुदी में जा बजा...मोहे...

धुन लगी है अब यही शामो सहर आठों पहार
तेरा जलवा हर घडी हर वक्तहो पेशे नजर
देखकर तुमको न ईमे बे नवा ए सींमबर
मिन्नतो से यह कहे सर रखके तेरे पाओंपर...मोहे...

दुसरी बाजूः—अपनी चांदसी सूरत दिखादो नबी
मेरी दिल की लगीको बुमा दो नबी
जामे मये वि ल इनायत होया रसूल
फुर्कत में आप की मेरा दिल है बहुत मलूल
अपने हसनका मदका ढिला दो नबी

असी से मिट रहे हैं इसी जुस्तजू में हम
मुद्दत सेरो रहे है इसी आरज़ूमें हम
बात बिगडी हुई है बना दो नबी–
ताकत नहीं जुदाई की अल्ला की कसम
बेताबो बेकरार हूं अब चाहिये करम–
अपना नूरानी चेहरा दिखा दो नबि–
दिन जिन्दगी के हाये यह यूंही गुजर गये–
अब तो चश्मे करमसे जिला दो नबी...अ

**प्यारु कव्वालचे** गेल्या साहा महिन्यांमधें निघालेले रेकॉर्डस्

| | | |
|---|---|---|
| P 10262 १०२६२ | किस बुतकी शान देखके | गजल कव्वाली |
| | अगर हिजर में यूंही जीना पडेगा | " " |
| P 10301 १०३०१ | दीवानोंमें जिकरे दिले दीवाना रहेगा | गझल कव्वाली |
| | बेवजह वह दिलदार वफा मुझ से हुआ है | मस्तजाद |

## THE LATE HARENDRANATH DUTT

**स्व. हरिंद्रनाथ दत्त.**

| | | |
|---|---|---|
| P 5182 ५१८२ | वन्दे मातरम् | राष्ट्र गीत. |
| | देश देशनन्दितकीर | |

श्री. **हरिंद्रनाथ दत्त** हे तर स्वर्गवासी झाले, पण त्याची कीर्ति अजूनपर्यंत जशीच्या तशी आहे. त्यांनीं गायन कलेंत मिळविलेला दर्जा ह्या रेकॉर्ड वाजविल्यावर आपोआप कळून येईल.

एक बाजूः––वन्दे मातरम् ।

सुजलां सुफलां मलयजशीतलां शश्यश्यामलां मातरम्
शुभ्र–ज्योतस्ना–पुलकित यामिनीं
फुल्ल–कुसुमित द्रुमदल–शोभिनीं
सुहासिनीं सुमधुर भासिनीं
सुखदां वरदां मातरम् ।

तुमि विद्या तुमि धर्म
तुमि हृदि तुमि मर्म्म
तूहि प्राण शरीरे ।

बाहु ते तुमि मा शक्ती
हृदये तुमि मा भक्ती
तोमारी प्रतिमा गडी
मन्दिरे मन्दिरे ।

तूंहि दुर्गा दश–प्रहरणा धारिणी
कमला–कमलदल–बिहारिणी,
वाणी–विद्यादायिनी नमामित्वां
नमामि कमलां अमलां अतुलां
सुजलां सुफलां मातरम् ।

श्यामलां सरलां सुस्मितां भाषतां
धरणीं भरणीं मातरम् ।

दुसरी बाजूः—देश देश नन्दित करि, मन्द्रित तब भेरी इत्यादि इत्यादि.

**CHHUNNU KHAN.** **छुन्नुखां**

| | | |
|---|---|---|
| P 17561 / १७५६१ | सरोद | सोहोनी |
| | ,, | मांड |

वा ! वा ! छुन्नु खां आज तर तुम्ही फारच कमाल केलीत. सरोद वाजविण्यांत यानीं अखिल हिंदुस्थानांत अग्रेसरत्वाचा मान मिळविला आहे. यावेळेला मुद्दाम लोकांच्या आग्रहावरून यांचे दोन पदांचे रेकॉर्डस घेतले आहेत.



# " हिझ मास्टर्स व्हॉईस "

## डबल स्प्रिंग

# नवा पोर्टेबल ग्रामोफोन

आकार ९" × १२½" × १७½"




" हिझ मास्टर्स व्हॉईस " ह्यांनी तयार केलेला हा अगदीं नवीन ग्रामोफोन होय ! त्यांतील आवाज स्पष्ट, मोठा आणि हुबेहुब येण्यासाठीं किती तरी नवीन नवीन योजना केलेल्या आहेत. उदाहरणार्थ फारच बळकट अशी डबल स्प्रिंग मोटार साउण्ड बॉक्स नं. ४, अगदीं नवीन फॅशनचा टोन आर्म, नीडल ठेवण्याची मशीनमध्येंच व्यवस्था व बाहेरून न दिसणारें हॉर्न इतर फोनोग्राफ पेक्षां दुप्पट मोठा आवाज ह्यांतून निघतो.

Printed by B. V Press Bombay, Published for the Gramophon Co. Ltd.
by H. M. Watson, 46, Forbes St., Fort, Bombay